**कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, कोल्हापूर येथे स्क्रिनींग थिएटरचे बांधकाम खर्चास वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण ८२२५/प्र.क्र.१९१(१)/सां.का.४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३०
दिनांक : ३१ मार्च , २०२५

**वाचा :** १) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्रमांक संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१०७/निओ-१अ, दि. २२ मे, २०२३
२) कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, मर्या., कोल्हापूर यांचे दि.०३ मार्च, २०२५ रोजीचे पत्र
३) कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, मर्या., कोल्हापूर यांचे दि.११ मार्च, २०२५ रोजीचे पत्र
४) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्रमांक : कोचिन-२०२५/प्र.क्र.२३(२)/सां.का.१, दि. २५ मार्च, २०२५

**प्रस्तावना** :

"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" अंतर्गत विविध नाविन्यपूर्ण उपक्रम / योजना विभागाकडून कार्यान्वित झालेल्या आहेत. त्याच पार्श्वभूमीवर, कोल्हापूर चित्रनगरी मधील चित्रीकरणासाठी पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देणे आवश्यक होते. यास्तव, कोल्हापूर चित्रनगरी येथील चित्रीकरण व त्यानुषंगाने उपनिर्दिष्ट ४ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

आता, सदर पायाभूत सुविधांच्या बाबींवरील खर्चास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्या., कोल्हापूर येथे खालील नमूद चित्रीकरणाशी निगडित पायाभूत सोयी-सुविधाच्या कामांसाठी निधी रुपये ६,६३,१४,०००/- ( रुपये सहा कोटी त्रेसष्ट लक्ष चौदा हजार फक्त ) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचा तपशिल | अंदाजित रक्कम (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | कोल्हापूर चित्रनगरी, कोल्हापूर येथे स्क्रिनींग थिएटरचे बांधकाम | ६६३.१४ |

**०२.** उपरोक्त नमूद चित्रीकरणाशी निगडित पायाभूत सुविधाबाबतचे काम करण्यासाठी कार्यान्वयीन यंत्रणा महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ, मुंबई ही असेल. सबब, सदर निधी महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ, मुंबई यांच्याकडे ठेव संलग्न स्वरुपात वर्ग करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**०३.** यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती (००) १०२, कला संस्कृती प्रचालन (०३) (०६) (२२०५ ३७३३), ५० इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

०४.  सदर प्रकरणी मंजूर करण्यात आलेली रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता लेखा अधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या रकमेची देयके संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालयाच्या आभासी वैयक्तिक ठेव लेखा (VPDA) द्वारे आहरित करण्यासाठी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथे सादर करुन विहित प्रणालीद्वारे संबंधितांना वितरीत करावी. सदर कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

०५.  सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या दि.११ जून, २०१८ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागांना बांधकामांच्या प्रस्तावांसाठी रुपये १५.०० कोटीच्या मर्यादेत खर्च करण्यास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०६.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०३३११८४११७५६२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.31 18:41:53 +05'30'

**( बाळासाहेब ई. सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, कोल्हापूर
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ, मुंबई
५. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई.
६. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-एक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल ( लेखापरीक्षा )-एक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१०. नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई
११. वित्त विभाग (व्यय-१५ /अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अवर सचिव (रोख शाखा / सां.का.१ ), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती - सां.का.४